# चोर राजनेता

# आणि बेधडक व्यंगचित्रकार

सिड हॉफ, मराठी : अश्विनी बर्वे



# चोर राजनेता
# आणि बेधडक व्यंगचित्रकार

सिड हॉफ, मराठी : अश्विनी बर्वे



*बिचारे न्यूयॉर्क शहर बरबाद होत होते. तिथं शाळा, पुल, दवाखाना, अग्निशामक दलाचे उपकरणे यांची भयानक अवस्था होती. हे सगळं एका मोठ्या, लालची, माणसामुळे होत होतं. तो नेहमी हिऱ्याची टाय पिन लावत असे. त्याचं नाव विलियम मॅरी ट्वीड होतं, कारण तो शहर चालवत असे, म्हणून सगळे त्याला "बॉस“ म्हणत असत. बॉस" ट्वीड विचार करत असे की शहराचे सारी संपत्ती फक्त त्याचे, आणि त्याच्या मित्रांची होती.*

*न्यूयॉर्क चे लोक खूप दुःखी होते. त्यांना कशाही प्रकारे "बॉस" ट्वीडपासून सुटका हवी होती. पण त्यांना स्वतःला असहाय्य वाटत होते. त्यांना एका चॅपियन ची गरज होती. एक दिवस तो चॅम्पियन आला. थॉमस नास्ट नावाच्या एका वर्तमान पत्राचा बेधडक व्यंगचित्रकार. त्याने आपल्या व्यंगचित्रांच्या साहाय्याने सगळ्या जगाला दाखवून दिले होते की "बॉस" ट्वीड वास्तवात किती नीच वृत्तीचा माणूस आहे.*

ही कहाणी त्या दोन माणसांशी आहे ज्यांनी गृहयुद्धाच्या नंतर अमेरिकी राजनीतीत इतिहास रचला. त्यातला एक, विलियम मेरी ट्वीड, न्यूयॉर्क शहरातल्या सरकार मध्ये एक खूप शक्तिशाली व्यक्ती होते. ज्यांनी स्वतःला आणि आपल्या मित्रांना मालामाल करण्यासाठी अप्रामाणिकपणे आपल्या शक्तीचा दुरुपयोग केला. दूसरी थॉमस नास्ट- एक व्यंगचित्रकार होता ज्याला असं वाटत होते की तो आपल्या व्यंगचित्राद्वारे त्या बदमाश लोकांचा पर्दाफाश करु शकतो आणि भ्रष्ट राजनितीशी लढू शकतो. मग त्याने आपले व्यंगचित्र प्रकाशित केले आणि ट्वीडला सत्तेतून हटवण्यास मदत केली. ही आधुनिक अमेरिकेच्या राजकीय व्यंगचित्राचा पाया होता.




खूप पूर्वीची गोष्ट आहे. हिऱ्याची मोठी टायपिन लावणारा एक बदमाश मनुष्य न्यूयॉर्क शहर चालवायचा.

त्याचे नाव विलियम मॅरी ट्वीड होता. पण सगळे त्याला "बॉस" म्हणत होते.




"हॅलो, बॉस," कोपऱ्यात उभा पोलीस म्हणत असे..

प्रत्येकजण ज्याला त्याचे उपकार हवे होते,तो त्याला "हॅलो, बॉस," म्हणत असे.




लोकं त्याला "बॉस“ म्हणत कारण तो टाऊनी हॉलचा प्रमुख होता. तिथं लालची लोक एकत्र जमत आणि शहर लुटण्याची योजना आखत.

जेव्हा तो सिटी हॉल फिरायला येई तेव्हाही लोक त्याला "बॉस" म्हणत असत.

"बॉस, कृपया आपण माझ्या जागेवर बसा,” मेयर म्हणे.





त्याने ट्वीडला त्याचे पाय टेबलवर ठेवू दिले आणि शहरातल्या शाळा, दवाखाने, पूल आणि इतर गोष्टीवर किती पैसे खर्च केले जावेत हे ही ठरवू दिलं. जो पैसा खूप कमी होता.

"बाकी सारा पैसा टमनी हॉल मध्ये माझ्यासाठी आणि माझ्या मित्रांसाठी आहे," ट्वीडने हसत म्हटलं. आणि मग त्याने पैसे एका मोठ्या गोणीत भरले आणि तो तिथून निघून गेला.



रस्ते खराब असले तरी "बॉस“ला त्याची काही पर्वा नसायची.



जर मुलांच्या दुधात माश्या पडत असल्या तरी त्याची "बॉस“ला काही पर्वा वाटायची नाही.

## ज्वेलरी स्टोर

त्याला फक्त आपल्यासाठी मोठ-मोठ्या हिऱ्याच्या टायपिन हव्या असायच्या..

मग काही नाराज नागरिकांनी एक बैठक बोलावली. “आपण एक नवीन मेयर निवडायला हवा आणि बॉस ट्वीड आणि टाऊनी हॉलला शहर बरबाद करण्यापासून वाचवले पाहिजे,” ते म्हणाले.






त्या बैठीकीबाबत ऐकून "बॉस" ट्वीड फक्त हसला. त्याने न्यूयॉर्क मध्ये रेल्वेभरून अनोळखी लोक आणले आणि आपल्या इच्छेनुसार त्यांना मतदान करायला लावले.

तो म्हणाला, “मला पाहिजे ते मी खरेदी करू शकतो, मला कोणी रोखू शकणार नाही.”

"बॉस ट्वीड एक हंसमुख एक चांगला मित्र आहे" टोळी रात्री उशिरापर्यंत गात होती.





टाऊनी हॉल मध्ये "बॉस" ट्वीड त्याच्या टोळीचं गाणं ऐकून खूप खुश झाला आणि त्यांनी टाळ्या वाजवल्या.

आता "बॉस" ट्वीडचा गिरोह शहराला आपल्या स्वरांनी लुटू शकणार होता.



एक दिवस थॉमस नास्ट नावाचा  एक आर्टिस्ट जो कुठेतरी दूर गृहयुद्धाचे व्यंगचित्र काढत होता, न्यूयॉर्कला आला.

ज्या क्षणी नास्ट आपल्या गाडीतून उतरला, त्याला लगेच कळले की काहीतरी गडबड आहे.

त्याने बघितलं की लोक खराब घरात राहण्यासाठी मजबूर आहेत. आणि मुलांना खेळण्यासाठी कुठेही चांगली जागा नाही.



त्याने जळणारी घरं पाहिली, फायर-ब्रिगेडचे लोक आपल्या जुन्या, तुटलेल्या साधनांनी आग विझवण्यास असमर्थ होते..

“यासाठी कोण दोषी आहे?”
थॉमस नास्टने विचारलं..

"बॉस ट्वीड," लोकं हळूच कुजबुजले.





"विलियम मॅरी ट्वीड!" नास्ट म्हणाला.

“मी त्याच्याबाबत तेव्हा ऐकलं होतं जेव्हा मी एक छोटा मुलगा होतो.”

त्याने तर शहराला मदत करायला हवी. पण असं वाटतं की तो फक्त स्वतःला मदत करत आहे.

नास्टने एक व्यंगचित्र काढलं जायत त्याने "बॉस" ट्वीडला एका विशाल चोराच्या रुपात दाखवलं ज्याच्यापर्यंत कायदा पोहचू शकत नव्हता.





नास्ट सरळ वर्तमानपत्राच्याऑफिस मध्ये गेला.

“मी माझ्या लेखणीने आणि शाईने, न्यूयॉर्क शहराला बॉस ट्वीडपासून मुक्ती देईन,” नास्टने वचन दिलं.

त्याने अजून एक व्यंगचित्र काढले ज्यात त्याने "बॉस" ट्वीडची पुरी टोळीला चोरांसारखे दाखवले.




अजून एक व्यंगचित्र काढले त्यात त्याने टाऊनी हॉलला एका भुकेल्या वाघाच्या रुपात असहाय्य लोकांना खातांना दाखवले.






वर्तमान पत्राने व्यंगचित्र लगेच छापले.

जेव्हा लोकांनी थॉमस नास्ट ने काढलेले "बॉस" ट्वीड आणि टाऊनी हॉलचे चित्र बघितले तेव्हा लोक खुदुखुदू हसले.

पण एक माणूस अजिबात हसला नाही. तो कोणी दुसरा नव्हता तर स्वतः "बॉस" ट्वीड होता.

"नास्ट! नास्ट!" तो म्हणाला.

“तो चिमण्यांची आणि फुलांची चित्रं का काढत नाही? त्याने आम्हांलाच का चुना लावला?”

आणि हे म्हणत "बॉस" ने वर्तमानपत्राचे शंभर तुकडे केले.





"बॉस" ट्वीड वर्तमानपत्र खरेदी करत राहिला आणि ते फाडत गल्ली-गल्लीत पळत राहिला.

पण आता खूप सारे वर्तमानपत्र थॉमस नास्टचे चित्र छापत होते.

आता जास्तीत जास्त लोक ते व्यंगचित्र बघून हसू लागले होते.



एक चित्रात "बॉस" ट्वीडच्या डोक्याच्या जागी पैशांची थैली दाखवली होती.

एका व्यंगचित्रात "बॉस" ट्वीड स्वतः निवडणुकीतली मते मोजतांना दाखवले होते.




एका अन्य व्यंगचित्रात "बॉस" ट्वीडला एका वर्गात दाखवलं होतं. तो शाळेतल्या मुलांना हे सांगत होता की त्यांनी कशाप्रकारची पुस्तके वाचायला हवीत.




नवीन बोर्ड की शिक्षण

"मला या गोष्टीची अजिबात पर्वा नाही की वर्तमानपत्रं काय म्हणत आहेत! कारण की खूप साऱ्या लोकांना वाचताच येत नाही.!

पण ते व्यंगचित्र! बापरे, तोबा!

त्यांचा अर्थ तर कोणीही समजू शकतो. "बॉस", टाऊनी हॉल मध्ये आपल्या टोळक्यावर ओरडला.

यावेळी टोळक्यातल्या कोणीही "बॉस" चा कोणताही जयजयकार केला नाही.






"बॉस" ट्वीड खुपसारे पैसे घेवून वर्तमानपत्राच्या ऑफिसमध्ये गेला आणि त्यांना खरेदी करण्याचा प्रत्यन केला.

"माफ़ करा, आम्ही विकाऊ नाही," वर्तमानपत्रवाले म्हणाले.



शेवटी, थॉमस नास्टच्या व्यंगचित्रांमुळे, शहरातले सगळे लोक एकत्र आले आणि त्यांनी टाऊनी हॉल ला हरवून सत्तेतून बाहेर काढलं.

नास्टने अजून एक व्यंगचित्र काढून ज्यात इशारा दिला होता की चोर आता हिसकावून घेण्यासाठी शहरावर आक्रमण करू शकतात.



मग "बॉस" थॉमस नास्टकडे गेला आणि त्याने त्याला खरेदी करण्याचा प्रयत्न केला.

"क्षमा करा, मी पण विकाऊ नाही," व्यंगचित्रकार म्हणाला.

१८७१ मध्ये "बॉस" ट्वीडला अटक झाली आणि त्याच्यावर खटला चालवला गेला.

शहर लुटण्याचा दोष त्याच्यावर होता.

“मी तुला बारा वर्ष तुरुंगात राहण्याची शिक्षा देत आहे,” न्यायाधीश म्हणाले.





"बॉस" ट्वीड तुरुंगात गेला.

“हा तर आपल्यापेक्षा मोठा बदमाश आहे,” इतर अपराधी म्हणाले जेव्हा त्यांनी "बॉस“ ला तुरुंगात येतांना पाहिलं.



पण एका रात्री -

"बॉस" ट्वीडने एका गार्डला लाच दिली आणि तुरुंगातून पळून गेला.

"बॉस" ट्वीड एका जहाजावर चढून समुद्र पार करून खूप दूर निघून गेला.शेवटी तो उन्हाच्या देशात स्पेन मध्ये पोहचला.



तिथं "बॉस"ट्वीडने स्वतःला एका मूळ निवासीच्या रुपात लपविण्याचा प्रयत्न केला.

तिथं त्याने हिऱ्याची टायपिन पण लावली नाही.पण एका माणसाला तो खूप ओळखीचा वाटला.

“तो "बॉस" ट्वीड आहे! मी त्याला वर्तमानपत्रात थॉमस नास्टच्या छापलेल्या व्यंगचित्रामुळे ओळखलं,” त्याने पोलिसांना सांगितलं.





"बॉस" ट्वीडला त्याची शिक्षा पूर्ण करण्यासाठी परत न्यूयॉर्कमध्ये आणलं गेलं. यावेळी तो तुरुंगातच राहिला. तो तिथंच गरिबीत मेला.



थॉमस नास्ट वर्तमानपत्रासाठी व्यंगचित्र  काढत राहिला.त्याने  आपल्या व्यंगचित्रात डेमोक्रेटिक पार्टीला एक “गाढव” आणि  रिपब्लिकन पार्टीला  “हत्ती  ” दाखवलं.



नास्टला ख्रिसमस आवडत होता. म्हणून त्याने सांताक्लाझची अनेक कार्टून्स काढली. त्यामुळे सांता कसा दिसत होता हे नास्टच्या चित्रामुळे प्रत्येक ठिकाणच्या मुलांना कळले आणि त्याचा सांताक्लाझ लोकप्रिय झाला.



जेव्हा थॉमस नास्ट व्यग्र नसे तेव्हा तो बऱ्याचदा शहरातल्या रस्त्यावर खेळणाऱ्या मुलांबरोबर खेळत असे. "मुलांच्या एका मस्त जगात जगायला हवं म्हणून मी कार्टून काढतो," त्याने मुलांना सांगितलं.

समाप्त